केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यक्रमांसाठी आदिवासी (TSP) उपयोजना करीता सन २०१९-२० चे प्रलंबित अनुदान सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून २२१०E४५५ या लेखाशिर्षातून राज्य हिस्सा रु. ५९८०.०० लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एनएचएम-०९१९/प्र.क्र.४७७/आ-७**
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
दिनांक : ०९ नोव्हेंबर, २०२०.

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थस-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६.४.२०२०
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थस-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक ०४.०५.२०२०
३) संचालक, वित्त व लेखा, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे क्र.राआसोम/एफएमजी/ कें.रा.हि./ १२८७०-८७७/२०२०-२१, दिनांक २६ मे, २०२० चे पत्र.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. बीयुडी-२०२०/प्र.क्र.०५/कार्या-६, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२०
५) विभागाचा समक्रमांक दिनांक २७ ऑक्टोबर, २०२० रोजीचा शासन निर्णय.
६) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. बीयुडी-२०२०/प्र.क्र.०५/कार्या-६, दिनांक ४ नोव्हेंबर, २०२०

प्रस्तावना :-

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरदायी आणि विश्वासार्ह, सर्व प्रकारच्या गरजूंना आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोग्य विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास "राष्ट्रीय आरोग्य अभियान" असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान व राष्ट्रीय रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनांचा समावेश केला आहे. राष्ट्रीय आरोग्य अभियान या केंद्र पुरस्कृत योजने करीता आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१९-२० चे प्रलंबित अनुदान सन २०२०-२१ च्या मंजूर अर्थसंकल्पीत तरतूदीतून राज्य हिस्सा राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वित असलेल्या राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियाना करीता आदिवासी उपयोजनेंतर्गत (TSP) आदिवासी विकास विभागाने संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली सन २०२०-२१ च्या मंजूर अर्थसंकल्पीत तरतुदीतून २२१०E४५५ या लेखाशिर्षातून राज्य हिस्सा रु. ५९८०.०० लक्ष एवढे अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी, मुंबई यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालील प्रमाणे नमूद केलेल्या योजना निहाय ४०% राज्य हिश्श्यापोटी नमूद लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२०-२१ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

**सन २०२०-२१ मधील राज्य हिस्सा**

(रु.लाखात)

| अ.क्र | राज्य हिस्सा तपशील | लेखाशीर्ष | अर्थसंकल्पीय तरतूद (मुळ) | मागणी रक्कम राज्य हिस्सा ४०% |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मागणी क्र. टी-५, २२१०, ०६ सार्वजनिक आरोग्य ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (१६) राष्ट्रीय आरोग्य अभियान राज्य आरोग्य संस्थांना सहायक अनुदान (राज्य हिस्सा ४०%), (कार्यक्रम) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०E४५५ | रु. ९२००.०० | रु. ५९८०.०० |

४. वित्त विभागाच्या दिनांक १६ एप्रिल, २०२० च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १६ एप्रिल, २०२० च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा

होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरिल निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १६ एप्रिल, २०२० च्या शासन निर्णयातील संबंधीत असलेल्या सर्व तरतुदीचे / अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

५. सदरचे अनुदान सशर्त असून वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

६. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.३९४/२०२०/व्यय-१३, दिनांक ०३.११.२०२० तसेच आदिवासी विकास विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २६३/का-६, दिनांक ०४.११.२०२० अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०९१३१७०४८७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2020.11.09 15:07:45 +05'30'

**(ज. स . तडवी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई .
६. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. वित्त विभाग ( अर्थसंकल्प), (अर्थोपाय) व व्यय-१३, मंत्रालय, मुंबई.
११. आदिवासी विकास विभाग (कार्यासन-६), मंत्रालय, मुंबई
१२. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग.
१३. निवडनस्ती ( आरोग्य-७) .